**उप प्रादेशिक परिवहन कार्यालय, नवी मुंबई या कार्यालयाचे थकित जागा भाडे अदा करण्यास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एमव्हीडी-०३२५/प्र.क्र.६०/परि-४**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई - ३२
दिनांक : २७ मार्च, २०२५

**वाचा :-**

१) परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र- काईबा (४३)/न.क्र.१४ /का-१० (१) / २०२४ /जा.क्र.७०३ दि.२०.०१.२०२५ व जा.क्र.३४९६, दि.२०.०३.२०२५.
२) मुंबई कृषि उत्पन्न बाजार समिती, मुंबई यांचे पत्र जा.क्र. मुंकृउबास/मार्केट-२/४०१/२३, दि.१३.०३.२०२३
३) उप प्रादेशिक परिवहन अधिकारी, नवी मुंबई यांचे पत्र क्र. प्रापका/नवी मुंबई/आस्था/२०२३/ जा.क्र.२२६१, दि.१८.०५.२०२३ व २०२५/जा.क्र.९२९, दि.१७.०३.२०२५.
४) मा. न्यायाधिकरण, मुंबई कृषि उत्पन्न बाजार समिती, मुंबई यांचा निर्णय जा.क्र.न्या./व.दा./ ४२/२०२४ दि. ०४.१०.२०२४.

**प्रस्तावना :-**

मुंबई कृषि उत्पन्न बाजार समिती, नवी मुंबई यांच्या दि. २०.०६.२००६ रोजीच्या पत्रान्वये विकास टप्पा -२, मार्केट-२, कृषी उत्पन्न बाजार समिती, धान्य मार्केट, सेक्टर नं. १९ ब, टी ब्लॉक, गेट क्र. ७ नवी मुंबई-४०० ७०३ या बाजार आवारातील कार्यालय क्र. टी-१ ते टी-७ व टी-१२ ते टी-२० अशी एकूण १३ कार्यालये उप प्रादेशिक परिवहन कार्यालय, नवी मुंबई कार्यालयास भाडेतत्वावर देण्यात आली होती. अनुदान उपलब्ध न झाल्यामुळे मुंबई कृषि उत्पन्न बाजार समितीस वेळोवेळी भाडे अदा करण्यास विलंब झाला. मुंबई कृषि उत्पन्न बाजार समितीने प्रलंबित भाड्यावर व्याज आकारणी करुन अदा करण्यात आलेल्या भाड्याच्या रक्कमेमधून प्रथम व्याज वळती करुन, उर्वरित रक्कम देय असलेल्या भाड्यात जमा करुन घेण्यात आली आहे.

२. कृषि उत्पन्न बाजार समिती, मुंबई यांनी दि. १३.०३.२२०२३ रोजीच्या पत्रान्वये माहे मार्च, २०१९ अखेरचे जागा भाडे अदा करण्यात आले नसल्याने माहे फेब्रुवारी, २०२३ अखेर मासिक भाडे पोटी विविध शिर्षकातंर्गत रू.६१,७४,३४०/- इतके येणे असल्याचे कळविले. उप प्रादेशिक परिवहन कार्यालय, नवी मुंबई हे शासकीय कार्यालय असल्याने माहे मार्च, २०१९ अखेरपर्यंतच्या जागा भाड्यापोटी रु. ३२,८५,३२७/- इतकी रक्कम वजा करुन उर्वरित व्याजाची रक्कम ( जागाभाडे व्याज, कृषि कर, स्वच्छ भारत कर, सेवाकर, एसजीएसटी व्याज, सीजीएसटी व्याज ) माफ करणेबाबत उप प्रादेशिक परिवहन

अधिकारी, नवी मुंबई यांनी उपसचिव, बाजार समिती, वाशी, नवी मुंबई यांना विनंती केली. त्यानुसार मा. न्यायाधिकरण, मुंबई कृषि उत्पन्न बाजार समिती, मुंबई यांनी त्यांचा निर्णय जा.क्र.न्या./व.दा./४२/२०२४, दि. ०४.१०.२०२४ नुसार फक्त माहे मार्च, २०१९ अखेर वसुलपात्र जागाभाडे रक्कम रु. ३२,८५,३२७/- (अक्षरी रुपये बत्तीस लक्ष पंच्याऐंशी हजार तीनशे सत्तावीस फक्त) व दाव्याच्या अनुषंगिक खर्चाची रक्कम रु. ५,०००/- असे एकूण रु.३२,८५,३२७/- इतकी रक्कम अदा करण्यात यावी असे कळविले आहे. त्यानुसार मुंबई कृषि उत्पन्न बाजार समिती, मुंबई यांना माहे मार्च, २०१९ अखेरपर्यंतचे जागा भाडे व दाव्याच्या अनुषंगिक खर्चाची रक्कम अदा करण्यास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय: -**

उप प्रादेशिक परिवहन कार्यालय, नवी मुंबई या कार्यालयाच्या माहे मार्च**,** २०१९ अखेरपर्यंतच्या जागा भाड्यापोटी मुंबई कृषि उत्पन्न बाजार समिती, मुंबई यांना वसुलपात्र जागाभाडे रक्कम रु. ३२,८५,३२७/- व दाव्याच्या अनुषंगिक खर्चाची रक्कम रु. ५,०००/- असे एकूण रु.**३२,९०,३२७/-** (रु. बत्तीस लक्ष नव्वद हजार तीनशे सत्तावीस फक्त) इतकी रक्कम अदा करण्यास या शासन निर्णयान्वये प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

२. यासाठी येणारा खर्च मुख्य लेखाशीर्ष मागणी क्र. बी-३, मुख्यलेखाशिर्ष २०४१, वाहनांवरील कर, (०२) (०१) प्रादेशिक कार्यालय, दत्तमत (२०४१ ००३६), उपशिर्ष (१४ भाडेपट्टी व कर) या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकून त्या-त्या वित्तीय वर्षीच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग पहिला, उपविभाग -१, अनुक्रमांक ६, नियम क्र. ४० अन्वये प्रशासनिक विभागास प्रदान केलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२५०३२७१८००५२७६२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SUNIL BABURAO APATE

Digitally signed by SUNIL BABURAO APATE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT,
2.5.4.20=19ff433c24f38ac95f09eaa0a14f560224a1a78a80f8b940775fc013021ca5ca, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=4EA86DEC92091A126823D249DF451DF3C8D235CDD7E9111D7624C78A7C95B318, cn=SUNIL BABURAO APATE
Date: 2025.03.27 18:01:58 +05'30'

**( सु. बा. आपटे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. महालेखापाल ( लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, १/२, मुंबई /नागपूर
२. परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई

३. परिवहन उप आयुक्त (निरीक्षण/लेखा), परिवहन आयुक्त कार्यालय, मुंबई
४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
५. कक्ष अधिकारी (बीयुडी-१), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
६. निवडनस्ती (परि-४)